राज्य गुन्हे अन्वेषण विभाग,म.रा.,पुणे यांच्या अधिपत्याखालील हस्ताक्षर व छायाचित्रण विभागाकरीता नव्याने निर्माण केलेल्या एकूण १० अस्थायी पदांना दि. ०१.०९.२०२१ पासून दि. २८.०२.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एमआयएस-१३२०/प्र.क्र.११८/पोल-४**
दुसरा मजला, मुख्य इमारत,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ३० सप्टेंबर, २०२१

**संदर्भ:-** १) गृह विभाग, शासन निर्णय, क्र.एफएसएल-०४१६/प्र.क्र.६४५/पोल-४,दि.१५.१०.२०१८.
२) गृह विभाग, शासन निर्णय, क्र.एमआयएस-१३२०/प्र.क्र.११८/पोल-४,दि.१८.०३.२०२१
३) अपर पोलीस महासंचालक (नि.व स.), म.रा.,पोलीस मुख्यालय,मुंबई यांचे क्र.पोमंस/२६-ब/ अपोमंस गुअवि/१० पदे/मुदतवाढ/२७/२०१९, दि.२२.०७.२०२१ चे पत्र.
४) वित्त विभाग,शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.१०.०८.२०२१

**शासन निर्णय** :-

राज्य गुन्हे अन्वेषण विभाग,म.रा.,पुणे यांच्या अधिपत्याखालील हस्ताक्षर व छायाचित्रण कार्यालयाचे पुणे येथे मुख्यालय असून, राज्यात मुंबई, औरंगाबाद व नागपूर येथे या विभागाची ०३ विभागीय केंद्रे कार्यरत आहेत. या विभागात महाराष्ट्रातील सर्व पोलीस ठाणे, मा.उच्च न्यायालय,मा.मुंबई सत्र न्यायालय, प्रथम वर्ग न्यायदंडाधिकारी, स्थानिक संस्था, शासकीय निमशासकीय कार्यालये यांचेकडून फौजदारी व दिवाणी स्वरुपाच्या विविध गुन्ह्यातील वादग्रस्त दस्तऐवजांचे परिक्षण व छायाचित्रण केले जाते. संदर्भ क्र.१ येथील शा.नि. दि.१५.१०.२०१८ अन्वये गुन्हे अन्वेषण विभाग,म.रा.,पुणे यांचे अधिपत्याखालील हस्ताक्षर व छायाचित्रण विभागाकरीता एकूण १० पदे नव्याने निर्माण करण्यात आलेली आहेत. या पदांना यापुर्वी संदर्भ क्र.२ अन्वये मुदतवाढ देण्यात आली होती. सदर मुदतवाढीचा कालावधी दि.३१.०८.२०२१ रोजी संपुष्टात आला आहे.

२. संदर्भ क्र.४ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२१ ते दि.२८.०२.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार संदर्भ क्र. ३ च्या पत्रान्वये अपर पोलीस महासंचालक (नि.व स.), म.रा.,पोलीस मुख्यालय,मुंबई यांनी अपर पोलीस महासंचालक, गुन्हे अन्वेषण विभाग,म.रा.,पुणे यांच्या आस्थापनेवरील १० अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२१ पासून पुढे मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केलेला आहे. त्यानुसार, सोबत जोडलेल्या विवरणपत्रात नमूद केलेल्या एकूण १० अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२१ ते दि.२८.०२.२०२२ पर्यंत खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

१) प्रस्तावित करण्यात आलेल्या पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यांपेक्षा जास्त काळ रिक्त नाही व पदे ज्या कारणासाठी अटी व शर्तींचे अधीन राहून मंजूर केली आहेत त्यांचे पालन करण्यात आले आहे.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.१०.०८.२०२१ नुसार विहित केलेल्या अटींचे व शर्तींचे कटाक्षाने पालन करण्यात येईल व त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात येईल.

३) मधल्या कालावधीपर्यंत अस्थायी पदांना सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याबाबतच्या आढाव्याची कार्यवाही पूर्ण न झाल्यास व अस्थायी पदांना त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतन व भत्यांचा प्रश्न निर्माण झाल्यास ती जबाबदारी महासंचालक, गुन्हे अन्वेषण विभाग,म.रा.,मुंबई यांची राहील.

३. यासाठी होणारा खर्च गृह विभाग, मागणी क्र. "बी-१, २०५५-पोलीस १०१, गुन्हा अन्वेषण व दक्षता (००) (०४) गुप्तवार्ता विभाग "या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग,शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०.०८.२०२१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११००११११४६१४९३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Shirish Nagorao Mohod

Digitally signed by Shirish Nagorao Mohod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66fda7e745bb4928b21046cecbf7bd8f40e4950e0a99497fa2862e1d37ed75b7, serialNumber=beb4df218cab93811ed9522b6f8ac2546899b499eb80512bfa5ec939466fb620, cn=Shirish Nagorao Mohod
Date: 2021.10.01 11:49:32 +05'30'

**( शिरीष मोहोड )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२. पोलीस महासंचालक, गुन्हे अन्वेषण विभाग,म.रा.,पुणे.
३. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
४. जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
६. वित्त विभाग (व्यय-७ - वित्तीय सुधारणा १), मंत्रालय, मुंबई,
७. निवडनस्ती/गृह विभाग (पोल-४).

**अपर पोलीस महासंचालक (गु.अ.वि.), पुणे कार्यालयाच्या अधिपत्याखालील हस्ताक्षर व छायाचित्रण विभागामध्ये नव्याने निर्माण केलेल्या १० अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत**

गृह विभाग शासन निर्णय क्र.एमआयएस-१३२०/प्र.क्र.११८/पोल-४,दि. ३०.०९.२०२१ सोबतचे विवरणपत्र

| **अ.क्र.** | **पदनाम** | **पद संख्या** | **पद निर्मितीचा शासन निर्णय** | **अस्थायी पदांना मुदतवाढ मिळाल्याचा शासन निर्णय** |
|---|---|---|---|---|
| १ | अति.मुख्य शासकीय दस्तऐवज परिक्षक | ०१ | शा.नि.क्र.एफएसएल-०४१६/ प्र.क्र.६४५/ पोल-४, दि.१५.१०.२०१८ | शा.नि.क्र.एफबीपी-०७१९/प्र.क्र.३८५/ पोल-४, दि.१८.०३.२०२१ |
| २ | शासकीय दस्तऐवज परिक्षक | ०२ | | |
| ३ | सहा.शासकीय दस्तऐवज परिक्षक | ०७ | | |
| | **एकूण** | **१०** | | |